**राज्यातील अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत दुसरी / तिसरी पाळी सुरू करणे. सन २०१४-१५ करिता अनुदानाचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः औप्रसं-२०१४/प्र.क्र.५४/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ११ फेब्रुवारी,२०१५

**वाचा -**

**१.शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक :आयटीआय-२००९/ (११/०९)/व्यशि-३, दि. २९/८/२००९ व दि.२१.८.२०१०**

**२. शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक औप्रसं-२०१४ /प्र.क्र.५४/का.८, दि.१५ जुलै, २०१४.**

**३. शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग, अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२ जानेवारी, २०१५.**

**प्रस्तावना -**

राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी ४२ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुस-या/तिस-या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणा-या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकडया सुरू करण्यास दि.२९.८.२००९ व दि. २१.८.२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या विभागाचे शासन निर्णय दि.१५.०७.२०१४ अन्वये सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता रु.५,४६,००,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाने दि.२ जानेवारी, २०१५ च्या परिपत्रकाव्दारे योजनांतर्गतासाठी अर्थसंकल्पित निधी खर्च करण्याची मर्यादा ६० % एवढी विहित करण्यात आली आहे. तसेच माहे जानेवारी २०१५ ते माहे मार्च २०१५ या तिमाहीकरिता ०१-वेतन, ,०६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क,१४ भाडेपटटी व कर,२४ पेट्रोल,तेल व वंगण,३४ शिष्यवृत्या व विद्यावेतन,यासाठीच्या योजनेतर व योजनांतर्गत तरतूदीच्या ४०% निधी पूर्वीच्या पध्दतीने एकत्रितरित्या वितरीत केली आहे.म्हणजेच यासाठी आता १००% तरतूद उपलब्ध राहील असे उक्त परिपत्रकात स्पष्ट करण्यात आले आहे.

**शासन निर्णय** -

अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या ४२ विद्यमान शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था तसेच बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणा-या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील सन २०१४-१५ चा खर्च भागविण्यासाठी "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" या लेखाशीर्षाखाली आता खालीलप्रमाणे रू.५,६१,७२,०००/- (रूपये पाच कोटी एकसष्ट लाख बाहत्तर हजार फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे. या विभागाच्या दि.१५ जुलै २०१४ च्या शासन निर्णयान्वये रू.५,४६,००,०००/- इतक्या निधीचे वाटप करण्यात आले आहे. आता वितरीत केलेली रक्कम वजा जाता उर्वरित वितरीत करावयाची रक्कम रू.५,६१,७२,०००/-इतक्या निधीचे वाटप पुढीलप्रमाणे करावयाचे आहे:

(रुपये हजारात)

| मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" | सन २०१४-१५ साठी B.D.Sप्रमाणे वितरीत करण्यात आलेले अनुदान (रू. हजारात) | शासन निर्णय दि.१५ जुलै, २०१४ अन्वये वितरीत केलेले अनुदान | १००% मर्यादेत वितरीत केलेली रक्कम वजा जाता उर्वरित वितरीत करावयाची रक्कम | ६०% मर्यादेत वितरीत केलेली रक्कम वजा जाता उर्वरित वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| वेतन | ९५१३० | ४४३९४ | ५०७३६ | ० |
| ०६ दूरध्वनी, वीज पाणी शुल्क | २७०० | १२६० | १४४० | ० |
| १० कंत्राटी पध्दतीवर घेतलेल्या सेवेवरील खर्च | २७०० | १२६० | ० | ३६० |
| ११ प्रवास खर्च | ९०० | ४२० | ० | १२० |
| १३ कार्यालयीन खर्च | २१६० | १००८ | ० | २८८ |
| १४ भाडेपट्टी व कर | ३६० | १६८ | १९२ | ० |
| २१ पुरवठा व सामुग्री | ४६८० | २१८४ | ० | ६२४ |
| २४ पेट्रोल, तेल व वंगण | ७२० | ३३६ | ३८४ | ० |
| २६ जाहिरात व प्रसिध्दी | ९० | ४२ | ० | १२ |
| २७ लहान बांधकामे | १८०० | ८४० | ० | २४० |
| २८ व्यावसायिक सेवा | ३१५० | १४७० | ० | ४२० |
| ३४ विद्यावेतन | २५२० | ११७६ | १३४४ | ० |
| ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | ९० | ४२ | ० | १२ |
| एकूण | ११७००० | ५४६०० | ५४०९६ | २०७६ |

२. सदर तरतूद संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी निधी वितरीत करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निदेश/नियमांचे पालन करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.२ जानेवारी, २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१०४५०४७६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.02.13 17:06:16 +05'30'

**( समीर साळंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
५. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व), महाराष्ट्र राज्य, संचालक प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत
९. नियोजन विभाग का. १४७५,
१०.वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
११.अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर रक्कम बी.डी.एस. वर उपलब्ध करून देण्याची विनंती करण्यात येत आहे.
१२.निवडनस्ती.